**प्रशासकीय कामकाज सुलभतेने व जलदगतीने होण्यासाठी मा.मंत्री, प्रशासकीय विभागांचे सचिव व क्षेत्रीय अधिकारी यांच्या बैठकासंदर्भातच्या वेळापत्रकाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१८१६/प्र.क्र.८४ /१८-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ११ नोव्हेंबर, २०१६

**<u>शासन परिपत्रक:-</u>**

प्रशासकीय कामकाज सुलभतेने व जलदगतीने होण्यासाठी मा.मंत्री, प्रशासकीय विभागाचे सचिव व क्षेत्रीय अधिकारी यांनी एकसंघपणे कामकाज करण्याच्या दृष्टीने मा.मुख्यमंत्री यांनी दिलेल्या निदेशानुसार मा.मंत्री कार्यालयांचे व प्रशासकीय विभागांचे सचिव व क्षेत्रीय अधिकारी यांनीही कामकाजाचे स्वरुप निश्चित केले तर सर्वांना एकसंघपणे काम करता येईल व प्रशासनात सुसूत्रता आणण्यास मदत होईल.

२. मा.मुख्यमंत्री यांच्या निदेशाच्या अनुषंगाने बैठक आयोजित करताना पुढील कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निर्देश सर्व मंत्रालयीन विभागांना व सर्व क्षेत्रीय कार्यालयांना देण्यात येत आहेत:-

अ) सोमवारी क्षेत्रीय अधिकाऱ्यांना मंत्रालयामध्ये बैठकीसाठी बोलावू नये. तसेच क्षेत्रीय स्तरावरील विभाग प्रमुखांनी सुध्दा त्यांच्या हाताखालील अधिकाऱ्यांना सोमवारी बैठकीसाठी बोलावू नये. यामुळे सर्व शासकीय कार्यालयांमध्ये सोमवारी सर्व अधिकारी उपलब्ध असतील याची जनतेला खात्री देता येईल.

ब) मंगळवारी मंत्रीमंडळाच्या बैठकीसाठी दिवस निश्चित केला असल्यामुळे त्यादिवशी सर्वसाधारणपणे सर्व लोकप्रतिनिधी मंत्रालयात उपस्थित राहतात. त्यांनी उपस्थित केलेल्या विकास कामांबाबत बैठका आयोजित करण्यात याव्यात. याशिवाय मंगळवार ते गुरुवार या कालावधीत क्षेत्रीय अधिकाऱ्यांबरोबर बैठका आयोजित करण्यात याव्यात.

क) शुक्रवार ते रविवार या कालावधीत शक्यतो मंत्रालयात बैठका आयोजित करण्यात येऊ नयेत. म्हणजे या कालावधीत क्षेत्रीय अधिकाऱ्यांना त्यांच्या क्षेत्रातील कामकाजांसंबंधात दौरे आयोजित करता येतील. तसेच मंत्री महोदय यांच्या दौऱ्यांच्या वेळी सर्व अधिकारी उपस्थित राहू शकतील.

ड) मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली सर्व सचिवांची पाक्षिक बैठक साधारणत: प्रत्येक महिन्याच्या दुसऱ्या व चौथ्या बुधवारी आयोजित करण्यात येत असल्यामुळे दुसऱ्या व चौथ्या बुधवारी सकाळी ९.३० ते दुपारी १२.०० या वेळेत शक्यतो सचिव अपेक्षित असलेल्या बैठका ठेवू नयेत असे मा.मुख्यमंत्री यांचे निदेश आहेत.

इ) दर महिन्याच्या चौथ्या बुधवारी मा.पंतप्रधान भारत सरकार हे "प्रगती" व्हिडियो कॉन्फरन्सिंगद्वारे आढावा घेत असल्याने दुपारी २.०० ते सायंकाळी ६.०० या वेळेत मुख्य सचिव व प्रगती व्हिडिओ कॉन्फरन्सिंगशी संबंधित सचिव अपेक्षित असलेल्या बैठका ठेवू नयेत असे मा.मुख्यमंत्री यांचे निदेश आहेत.

३. वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन केले जाईल याची व्यक्तिश: जबाबदारी मंत्रालयीन प्रशासकीय विभागाचे सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव तसेच सर्व विभागीय आयुक्त व सर्व जिल्हाधिकारी यांची असेल.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११११५२७००७६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Swadheen S Kshatriya

Digitally signed by Swadheen S Kshatriya
DN: c=IN, o=All India Service, ou=Chief Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Swadheen S Kshatriya
Date: 2016.11.11 15:44:32 +05'30'

**( स्वाधीन क्षत्रिय )**

शासनाचे मुख्य सचिव

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव (५ प्रती) (पत्राने)
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
६) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
७) मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मा.मुंबई उच्च न्यायालय
८) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
९) प्रबंधक, मा.मुंबई उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
१०)प्रबंधक, मा.मुंबई उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई

११) प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, १ला मजला,

नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ४०० ०३२

१२) सचिव, राज्य निवडणूक आयोग, १३वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ४०० ०३२

१३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने), बँक ऑफ इंडीया इमारत, मुंबई २३

१४) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई

१५) मा.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ४०० ०३२

१६) सर्व विभागीय आयुक्त

१७) सर्व जिल्हाधिकारी

१८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

१९) सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख /

२०) प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख

२१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती)

२२) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने

२३) निवड नस्ती (कार्यासन १८), सा.प्र.वि.,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२